सेवाप्रवेश नियम

---

पदोन्नतीसाठीची पूर्वअट म्हणून निम्न संवर्गात/सेवेत/श्रेणीत किमान सेवेसंबंधीची अट विहित करणे.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक-एसआरव्ही-१०८८/१०९/बारा,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक- ३१ मे, १९८९.

वाचा:- १] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-१२७७/१२, दिनांक १४ ऑक्टोबर, १९७७.

२] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-१२७७/१२, दिनांक ३ सप्टेंबर, १९७९.

३] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-१०८०/१२, दि. २० जुलै, १९८१.

४] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-१०८८/१०९/बारा, दिनांक २५ ऑगस्ट, १९८८.

परिपत्रक -

शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-१०८०/१२, दिनांक २० जुलै, १९८१ आणि क्रमांक एसआरव्ही-१०८८/१०९/बारा, दिनांक २५ ऑगस्ट, १९८८ अन्वये काही विशिष्ठ पदोन्नतीकरीता निम्न पदावर किमान सेवेची अट पदोन्नतीसाठीची पूर्व अट म्हणून विहित करण्यात आलेली आहे. सदरहू तत्व संबंधित सेवाप्रवेश नियमांत अंतर्भूत करण्याची कार्यवाही करणे आणि अशी कार्यवाही पूर्ण होईपर्यन्त पदोन्नती करतांना उपरोक्त परिपत्रकातील तत्वाचा अवलंब करणे आवश्यक आहे.

उपरोक्त आदेशांनुसार पदोन्नतीसाठी आवश्यक असलेल्या विहित-अनुभवाचा कालावधी हा संबंधित सेवाप्रवेश नियमातील तरतुदींनुसार नियमित पध्दतीने केलेल्या नियुक्तीनंतरचा असला पाहिजे असेही आता स्पष्ट करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ भा. म. भणगे ]
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई [पत्राने],

मंत्रालयाचे सर्व विभाग,

मंत्रालयाच्या विविध विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख.